लोकप्रिय शिघ्र कविवर्य

## लहरी हैदरसाहेब कृत

# हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा

हृदयद्रावक

# पोवाडा.



आवृत्ती २ री.

प्रकाशकः—रामचंद्र बाबाजी जाधव,
प्रोप्रायटर दासराम बुकडेपो बुकसेलर्स अँड पब्लीशर्स
महाद्वार रोड, कोल्हापूर सिटी.
शिवशक २५७ ) किं० १॥ आणा ( इ. सन १९३१

'श्रीसुदर्शन' प्रेस कोल्हापूर.

## लोकप्रिय शिघ्र कविवर्य लहरी हैदरसाहेब कृत.
## दुसरी पुस्तकें.

**अधुनिक फाजिल सुधारणेचा पोवाडा** हा पोवाडा इतका लोकप्रिय झाला आहे कीं, एक वर्षाचे आंतच याच्या ४००० प्रती खपल्या असून अद्याप हिंदुस्तानचे सर्व भागांतून यांस जोराची मागणी आहे. 'हे काव्य प्रत्येकांनीं संग्रही ठेवण्यास योग्य असून अशिक्षितापासून सुशिक्षितापर्यंत व तरुणापासून वृद्धापर्यंत सर्वांना या पासून बोध घेतां येणारा आहे' किं० ८-॥

**राजर्षि श्रीशाहू महाराज यांचा पोवाडा** कोल्हापुरांतील निरनिराळे नामांकित शाहीरांनीं जे शाहू महाराजांचे पोवाडे लिहिले आहेत त्या सर्वांत या पोवाड्याचा पंचविद्यमाने पहिला नंबर लागला आहे. व कवि ल. हैदरसाहेब यांना नं. १ चें बक्षिस छत्रपती श्रीराजाराम महाराज यांचे हस्तें देणेंत आलें आहे. पोवाडा संग्रही बोधप्रद आहे. किंमत ॥-

**"नरवीर तानाजी माळुसरे यांचा पोवाडा"** या पोवाड्यास नंबर १ चें बक्षिस व सर्टिफिकेट पुणें केसरी ऑफिस मधून मिळालें आहे. किं० ३ आणे.

प्रकाशकः—**दासराम बुकडेपो.**

महाद्वार रोड कोल्हापूर सिटि.

# हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा पोवाडा.

## चौक १ ला.

सुवर्ण भूमिचा महान । देश हिंदुस्थान । हलिंचा मान । शेतकरी दारिद्र्यांत बेजार । खर्च भागेना करुनि रोजगार । आळस व चैन वाढली फार ॥ धृ. ॥

सर्व कच्चा माल हा देशी । जात परदेशीं । परत आपणाशीं । यंत्रांतुन येतां तयार होऊन । विकलेला चार आणे घेऊन । घेतों आम्हि दहा रुपये देऊन ॥

साडेअठ्ठाविस लक्षाचा । चौरस मैलाचा । देश हा साचा । भव्य विस्तीर्ण सुपिक राहून । दशा कां बसलि असी होऊन । घेइ कोण कारण समजाऊन ॥

---

**टीप** यांतील चाली राजर्षि श्री शाहू महाराज यांच्या पोवाड्यांतील आहेत.

बत्तिस कोटि प्रजाजन खास । हिंदुस्थानास । पैकिं समयास । बाविस कोटि अर्धपोटिं खाऊन । शेतकरि बसले खालाऊन । पाहि कोण विचार कास लाऊन ॥

कापड मालाविषयिं हिंदुस्थान । प्रसिद्ध होता महान । अजुनी सुद्धां जाण । विकानेर, डाका विलासपूरहून । धाबाळि, कद, कोशे, येति होऊन । तहान भुक । हरति माल पाहून ॥

इंग्लंडच्या बाजारांत । एके काळांत । हिंदुस्थानांत । तयार झालेला कपडा जाऊन । भयंकर खपतो असें पाहुन । कायदा केला जबरदस्ति लाऊन ॥

हिंदुस्थानीं कापडावर । कडक बहिष्कार । इंग्लंड बुडणार । ह्मणुन त्यानीं दूर दृष्टि पुरऊन । घेऊं नये कोणीं असें ठरऊन । पास केला कायदा सभा भरऊन ॥

**चाल ( चहुकडुनी त्रास शाहू राया )**

कां देवा कोप हिंदुस्थाना वरी कोण हा ॥ धृ. ॥
देशबुद्धि कौशल्याचा । ह्मणुनि दोष कां हा ॥ १ ॥

जगामध्यें नंबर पहिला । कसचि देश की हा ।। २ ।।
माल खपायासी आपुला । जुलुम काय हा हा ।। ३ ।।
तोडियलीं बोटें त्यांनीं । हिंद जनांचीं हा ।। ४ ।।
पंख उपडुनीया केले । पक्षि लोद पा हा ।। ५ ।।

।। चाल ।।

( अधिकारि युरोपीयन परकी )

त्यानिं आपला माल खपण्यास । हिंदुस्थानास । त्रास बहु दिधला हो पहा आरंभाला ।। हो जी जी जी ।।

कापसाचि खरेदी मोटी । बोटिच्या बोटी । भरुनि जाण्याला हो क्रम सुरू झाला ।। हो जी जी जी ।।

भुइमूग गूळ गहुं ताग । कापुस जागोजाग । मात्र बहु त्याला हो नेति युरोपाला ।। हो जी जी जी।।

दिसे पैसा शेतकऱ्यास । धान्य पेरायास । धजेना झाला हो भाव नाहीं त्याला ।। हो जी जी जी ।।

धान्याच्या दुष्काळानें । कायमचें ठाणें । दिले देशाला हो भिकारपणा आला ।। हो जी जी जी ।।

चहुंकडे गिरणिचा माल । भरला बेताल । तोच डोळयाला हो दिसूं लागला ॥ हो जी जी जी ॥

त्यांनें देशि धंदा हा खरा । बुडविला पुरा । करा विचाराला हो अजुनि कां निजला ॥ हो जी जी जी ॥

घरोघरीं सूत कातणार । चरख्यावर फार । होते देशाला हो धंदा सर्वांला ॥ हो जी जी जी ॥

बैत्याचा सुतार लोहार । परिट चांभार । सतत कामाला हो शेतकऱ्याला ॥ हो जी जी जी ॥

बैत्याचा नहावी सुभा । दारामध्यें उभा । असे सकाळाला हो डोइ करण्याला ॥ हो जी जी जी ॥

शेतकरी खरोखर धनी । पण गिरण्यानीं । देशावर हल्ला हो पुरा तो केला ॥ हो जी जी जी ॥

देशाच्या धनिक लोकांनी । गिरण्या आणउनी । धंदा सुरु केला हो देश बुडवीला ॥ हो जी जी जी ॥

**चाल** ( दिधली मदत प्रसंगीं हो प्रभु शाहू दीलदार )

देशी बुडाले धंदे हो मग कुठला रोजगार ॥ धृ. ॥

सहालक्ष हजार पंचांशी । वर सहाशे बाविस ऐसी । हीं खेडिं गांवें देशासी हो शेतीवर जोरदार ।

शहरांचा हिशेब सारा । दोन हजार तिनशे तेरा ।
तुह्मिं स्वस्थपणे अवधारा हो मनिं करुनी सुविचार ॥

विकुनिया गाइ कसावांनां । पैदास कमी झालि
जाणा । किंमत जबर बैलांना हो पडुं लागे अनीवार ॥

थोडासा कमी जर पडला । पाऊस एका वर्षाला ।
शेतकरी घाबरा झाला हो हुडकी तो सावकार ॥

या परी कर्ज बाजारी । होउनी शेतकरि भारी ।
पिकेल तें सावकारादारीं हो आणि उसणें मागणार ॥

वैतागुनि घरदाराला । सोडोनि रोजगाराला ।
गिरणिच्या जाय कामाला हो घेवोनी परीवार ॥

॥ मिळवणी. ॥

घरेंदारें सोडुन खेडींपाडीं । लागलि देशोधडी । होऊनि
बापुडीं । झालि अन्नान्न दशा अनिवार । मातिमोल
झाला करूनि संसार । मरण दे ह्मणति देवा एकवार॥ १॥

## चौक २ रा.

अमदाबाद मुंबई वगैरेंत । मोठ्या शहरांत ।
गिरण्यांची साथ । मांडदलवाले लोकांनीं खास ।

गिरण्या लाविल्या ठीक ठिकाणास । चालले शेतकरी धंद्यास ॥

साळि कोष्टि इतर धंदेवाले । अन्नास झागलेले । भटकुं लागले । खेंडि झालिं ओस भरति शहरास । मुंग्या जशा भरतात वारूळास । तशीं झालिं शहरें आणा ध्यानास॥

मुंबैची वस्ती भली । जंगि वाढली । रहायाशीं खोलों । मिळेना भाडें जबर महिन्यास । मिळुनिया दहाबारा इसमास । घेति एक खोलि सर्व रहायास ॥

किति एक दुकाना पुढें । उघडे वागडे । पडति वापुडे । विचारे धडपडती रस्त्यास । कळवळा सुटतो बघणारांस । देत कोण पै पैसा धर्मास ॥

त्या चिकार चाळिंत सारी । दुर्गंधी भारी । येत ओंकारी । लावावा लागे पदर नाकास । जणू प्रत्यक्ष भासे संडास । जिवंत भोगिती नर्क वासास ॥

त्यांतून हवा कोंडती । उकाडा अती । धुराटी किती । मोकळ्या हवेंत रहाणारांस । भराया पोटाच्या खळग्यास । ओढिलें दुर्दैवानें त्यांस ॥

**चाल** [ ममबंधु सखा शुन्य जगी ]

कुणिवालि अशा दीन मजूरासि नसावा । क्षणभर न विसावा ॥ ध्रु. ॥

[ अंत्रा ] नीतीहि बुडे धर्म बुडे कोण दशाही । कोणि न पाही ॥ गिरणींत सदा गरिब मजुर खपत असावा । कोणी न पुसावा ॥

[अस्ताई] नाना व्यसनें दारुबाजी जडती सारी । रोगाचि येत साथ सदा भारी ॥ मरतात पटापट मजुर शेट हसावा । लोडासि बसावा ॥

[ अंत्रा ] पोटा न पुरें अन्न बरें मजुरि हि कांहीं । भरपुर ना हीं ॥ मजुरींत खपे गरिब नफा खूप मिळावा॥ एकटाच गिळावा ॥

[अस्ताई] हे संप अती ह्मणुनि होती या हरठाया । मोटार उडवी शेट हवा खाया ॥ मजुरास नसें वस्त्र घाम गळत असावा । कोणा न दिसावा ॥

चाल [ गिलच्याची ]

धष्टपुष्ट असे उघड्या हवेंतिल शेतकरी रहाणार जी ॥
गाईबैलांनीं गोठा गच्च भरलेला दिसत मनोहर जी ॥
धान्याची समृद्धि घरामध्यें मुलेंबाळें भरपुर जी ॥
सर्व आनंदी प्राणी हुषारी खळे चेहऱ्यावर जी ॥
त्यांच्या घरांतिल सुखापुढें तें फिकें राज मंदिर जी ॥
शेतकरी हा राजा असोनी संकट त्याच्यावर जी ॥
साडेसाती लागली गिरणिच्या धंद्याची भरपुर जी ॥
गटारांत जसे किडे बुचबुचती तसे एकमेकावर जी ॥
जागयाच्या अडचणी मुळें किति दुःख होत जबर जी ॥
उष्ण विषारी चहा तशामध्यें ढोकसती अनिवार जी ॥
त्यांत प्लेग कालरा सांतिच रोग वरचेवर जी ॥
दवाखानें वाढले लागतो ठेंचेला डॉक्टर जी ॥

चाल [ सबसे राम भजन करलेना ]

आली दशाही काय हिंदुस्थानाशीं हाय हाय ॥ धृ ॥
निती मता बिघडली लागले नाना छंद ते काय ।
दारू शिंधी अफीण ताडी चरस भांग ओढाय ।
हिंदूस्थानाशीं हाय हाय ॥ १ ॥

खेळ तमाशे नाटक पहातां जरी कळेना काय ।
सिनेमाने तर कमाल केली देशाशी बुडवाय ।
हिंदूस्थानाशीं हाय हाय ॥ २ ॥
एक पैशामध्ये पानसुपारी कात धजेना ध्याय ।
पैसा देउन दिड पानाची पट्टी चघळित जाय ।
हिंदूस्थानाशीं हाय हाय ॥ ३ ॥
स्वच्छ पिण्याचें पाणि परंतू तें कुठले आवडाय ।
ग्यास भरलि बाटली पाहिजे फइदिर्शा बाजाय ।
हिंदूस्थानाशीं हाय हाय ॥ ४ ॥

॥ मिळवणी. ॥

वर्णितो आला निट ओघ । नानातऱ्हा भोग । हाचि महारोग हिंदुस्थानांत फैलाउन फार । देशाची पाळेंमुळें खणणार । गड्यानो व्हा सावध एकवार ॥ २ ॥

## चौक ३ रा.

अन्ना प्रमाणेंच कपड्याची । जरूर आहे त्याची ।
म्हणून देशाची । द्रव्य हानि किती होते समयास ।

रुपये जाति साठ कोटि वर्षास । निव्वळ हे परदेशी कपड्यास ॥

त्यापैकिं हिंदुस्थानांत । कांहिं नाहिं रहात । परकि देशांत । पैशाची लागुन गेली रास । आलें दुर्भिक्ष हिंदूस्थानास । आणा तुह्मि चतुर सूज्ञ ध्यानास ॥

या साठिं खादि वापरा । देश हा तारा । उन्नत्ती करा । महात्मागांधींच्या वचनास । सत्य मानुनि घ्या आचरणास । लाभेल चीरसौख्य देशास ॥

जाडेभरडें देशी सूत । खादिचें होत । अशी समजुत । व्यर्थ मनिं कधीं करू नये खास । गिरणिपेक्षांही हात रहाटास । सूत उत्तम निघतें विणण्यास ॥

रेशमी लोंकरी सुती । हव्या त्या जाती । विणुनि काढिती हात मागावरती वस्त्रास । शक्ति प्रमाणें कुणिहि घ्यायास । मिळे स्वदेशि माल सर्वांस ॥

हा देशि कपडा घेण्यांत । फायदा त्यांत । आपले देशांत । दिलेला पैसा परदेशांस । एक पै सुद्धां जात नाहिं खास । रोजगार मिळतो देश बांधवांस ॥

**चाल** [ हमारे नबी आज दूला बने है ]

स्वदेशी तुम्ही आज खादीच घ्या हो ॥ ध्रु. ॥

म्हणतिल कोणी महाग पडे ती । उत्तर यासी ऐका पुढती ॥ मि. ॥ गोरगरीबांनां जगवा हो आज खादीच घ्या हो ॥

बत्तिस कोटी शेतकऱ्यांना । वर्षांतिल सहा महिने त्यांनां ॥ मि. ॥ धंदा नसूनी बेकारिच हो । आज खादीच घ्या हो ॥

भिक्षा देतां भिकाऱ्यानां । त्याच्या पेक्षां बेकारानां ॥ मि. ॥ पुण्य करा धंदा द्या हो । आज खादीच घ्या हो ॥

इतर कामें नसती जेव्हां । कोणीहि काता सूताचि तेव्हां ॥ मि. ॥ जोड धंदा हा बरवा हो । आज खादीच घ्या हो ॥

कुटुंबांतिल सर्व जणांनां । होइल धंदा हा शुभ माना ॥ मि. ॥ घर बसल्या हा करवा हो । आज खादीच घ्या हो ॥

## चाल [ जी जी ]

कुणि ह्मणतिल आमच्या देशि धनिक लोकांनीं जी जी ॥
मोठमोठ्या लाविल्या गिरण्या ठीकठीकाणी जी जी ॥
त्यांत लाखो मजुरदार आमचेच हिंदुस्थानीं जी जी ॥
आह्मि त्यांतिल कापड वापरतो घेउनी जी जी ॥
या वरती उत्तर ऐका लक्ष देउनी जी जी ॥
आणलेल्या गिरण्या त्या परदेशांतुनी जी जी ॥
वाढवाया आपला नफा गिरणिचे धनी जी जी ॥
खपविती माल वाटेल् तो भाव लाउनी जी जी ॥
मजुरांच्या मर्जीरित शिवाय करति काटणी जी जी ॥
गरिबांच्या पोटाकडे धनिक पाहिना कुणी जी जी ॥
त्यामुळें संप होतात ठीक ठीकाणी जी जी ॥
या गरिब जनांच्या मुंड्या मुरगाळुनी जी जी ॥
घेतात इच्छा आपली तृप्त करोनी जी जी ॥
हा बसला देश अन्नास महाग होउनी जी जी ॥
ह्मणुनि या गिरणि मालाचा नाद सोडुनी जी जी ॥
जगवावें आपुल्या देश बंधु लागुनी जी जी ॥

चाल [ इनामे नोकरीची नी ]

जरीया चालल्या गिरण्या । तरीना काम सर्वांना ॥ ध्रु. ॥

पावणेचार लक्ष लोकांनां । गिरणिचे काम हें त्यांनां ।
कोटि बावीस मजुरांचा । सुटावा प्रश्न हा कोणा ॥
खादिच्या देशि चळवळीला । आले जें स्वरुप हल्लींला ।
एक ते लक्ष मजुरांना । काम हें लागलें त्यांनां ॥
खादिनें विषमता जाती । खादिनें होत उन्नत्ती ।
महात्मा गांधिचा बाणा । खादिनें होय संघटना ॥
सरासरि एक इसमाचें । पहा उत्पन्न दिवसाचें ।
गरिब श्रीमंत सर्वांची । वाटणी सारखी माना ॥
तीन रुपये अमेरिकेला । दोन इंग्लंड देशाला ।
माणसी हिशोब दिवसाचा । मिळतसे फायदा त्यांनां ॥
आह्मां हिंदुस्थानियांसी । दोन आणे होत दिवसासी ।
असा हा देश खालवला । पहा उघडे करुनि नयना ॥

॥ मिळवणी. ॥

या खादीनेच अखेरिला । सुदिन देशाला । मिळेल पहायाला । केला जर सर्वांनीं निर्धार । माहात्मा गांधिजिचे उद्गार । सत्य तें सत्य नाहिं टळणार ॥ ३ ॥

## चौक ४ था.

गोरक्षण हिंदुस्थानाला । हवें सर्वांला । शेत कामाला । मुख्यतः बैल हवेत कसदार । त्यांच्या जिवावरति देश जगणार । आलें हें चालत पुर्वापार ॥

हिंदु मुसलमान वगैरेनां । सर्व जातिनां । शेति आहे जाणा । सर्वांना पुज्य गाय असणार । नाहिं कुणालाहीं नको होणार । बंधुनो करा पुर्ण सुविचार ॥

गाइकसाव दलाल येउनी । खरेदि नेउनी । निर्दय होउनी । हज्जारो गाइ करति ते ठार । आहेत थोडे मुसलमानहि खाणार । पण आहे वेगळाच प्रकार ॥

गाईकापाळ्यांत असें कांहीं । धर्मामधें नाहीं । तर या गाई । गडप कुठें होती बेसूमार । इतक्या गाईंचा मांसाहार । कोण करतात एका साधार ॥

या हिंदि गाइंचे मांस । सुकें खाण्यास । गोऱ्या लोकांस । भरुनि या वोटि जातें अनिवार । चामडेंही जाते खरा प्रकार । मिळति त्याचे जोडे त्यांना मजेदार ॥

पुर्वि सत्ताविस कोटि गाई । होत्या या ठाई । हलि त्या पाही । फक्त चारच कोटि दिसणार । गोरक्षण अजुनि नाहिं गोणार । तर मग होतिल त्याही पार ॥

**चाल** [ मुळशीच्या पाळण्याची ]

गोमातेचा नाश असा जो झाला । देशाला बुडवायाला ॥ ध्रु. ॥

या गाईंच्या राक्षसि संव्हारानें । माखला देश रक्तानें ॥ दहि दूध किती पौष्टिक लोणी खाया तें दुर्मिळ झालें पहाया ॥

दहा वीस रुपयू ज्या बैला ।
शें दिडशें पडती त्याला ।
म्हणुनिया शेति धंद्याला ।

ही कीड किती जबर लागली याला । देशाला बुडवायाला ॥

त्या पुर्वीच्या अकबर हुमायुनानें । काढिली होति फर्मानें त्या यवनांनीं आपुल्या अमलाखालीं । गोवधास बंदी केली ॥

हें आह्मी विसरुनि गेलों ।

चोंचल्यांत चकभुल झालों ।
कां जिवंत असुनी मेलों ।
कां यावें हो आह्मीं या जन्माला । देशाला बुडवायाला ॥
या शेतीच्या अखंड धंद्यापाई । पाळाव्या सुंदर गाई ॥
उत्तमसे ते बैल निपजतिल भारी । मिळतील स्वस्त बाजारी ॥
या गोरक्षण नांवानीं ।
संस्था ज्या ठीकठिकाणीं ।
काढोनी कित्त्येकांनीं ।
नांवावर या खूप मारिला डल्ला । देशाला बुडवायाला ॥
शिवछत्रपती अवतारी नर होता । गोसंवर्धनाचा त्राता ॥
गोरक्षण हें जर केलें सर्वांनीं । भरभराट होइल आणि ॥
कसला जरि प्रसग येई ।
विकुंनका कसाबा गाई ।
निश्चया कराया ठाई ।
मग काय कुणा ताकत तो पहाण्याला । देशाला बुडवायाला ॥

त्या छत्रपती, राजर्षी शाहूनीं । गोरक्षण केलें त्यांनीं ॥
या करविरच्या, इलाख्यांत कोठेंही । मारूं नये कोणी
गाई ॥

दिला हुकूम हा सक्तीचा ।
बोधही केला खादीचा ।
मिळविला लोभ जनतेचा ।

ते ह्मणत सदा, नवनखरा जो आला । देशाला
बुडवायाला ॥

**चाल** [ फासे पारधी लोक ]

गुरें ढोरेंहीं उत्तम आपुलीं शेती करण्याला ।
शेण पाण्याचें खत फुकटचें मिळेल जमिनीला ।
हा जी जी हो जी जी ॥
स्वस्त होतिल गुरें नेटानें करा प्रयत्नाला ।
भुलूं नका तुह्मि त्या परदेशी यंत्र साधनाला॥हा जी जी॥
आपुल्या जमिनी विभागणीनें भावा बंदांला ।
वाटुन जाउन लहान तुकडे आलेत वाट्याला ॥
हा जी जी हो जी जी ॥

त्यांत कष्ट करण्यास बैला विण नाहिं काय पल्ला ।
बुडूं नकाहो व्यर्थ यंत्राच्या लागुन नादाला ॥
हा जी जी हो जी जी ॥

परतंत्री तें यंत्र फायदा नाहीं आपणाला ।
मोडल्यावर अडचण होइल त्याचि उकिरड्याला ॥
हा जी जी हो जी जी ॥
कोणी ह्मणती घ्या हप्त्यानें यंत्रें तुह्मांला ।
मला वाटतें फुकट सुद्धां देतिल नमुन्याला ॥ हा जी जी ॥

कलाल तैसे दलाल त्यांचे तुह्मां फसविण्याला ।
टपलें जसें मांजर उंदरावर करावया हल्ला ॥
हा जी जी हो जी जी ॥

यंत्रें घेउन आपला पैसा तो परदेशाला ।
आतां तरी हो नका भालऊं करा विचाराला ॥
हा जी जी हो जी जी ॥

गाई पाळा खादि वापरा सुदीन पाहायाला ।
भुलूं नका तुह्मि त्या परदेशाच्या नवनखऱ्याला ।
हा जी जी हो जी जी ॥

**चाल** [ हजरत सलाम घ्यावा ]

जागृत स्वदेश व्हावा । देवा जागृत स्वदेश व्हावा ॥
धावा हा परिसावा देवा जा० ॥ धृ ॥
परावलंबी पणा नसावा । चरख्यानें निरसावा ॥ देवा ॥
गुलामगिरिचा डाग पुसावा । तोंचि सुदिन दावावा॥देवा॥
भिरुपणाचा दोषचि जावा । धैर्य रवी उगवावा ॥देवा॥
ऐक्य सुखाचा भाव असावा । द्वेश मनांत नसावा॥देवा॥

॥ मिळवणी. ॥

सद्‌गुरू **लक्षुमण** ज्ञानी । मती दिलि त्यांनीं ।
करविरच्या स्थानी । **लहरी हैदर** विराचित साधार ।
होईल क्षमा दोष रहाणार । हौसक्षिर न्याय श्रोते
करणार ॥ ४ ॥



# दासराम बुकडेपो कोल्हापूर.

## सत्यशोधक समाज मताचीं पुस्तकें.

| किंमत. | पुस्तकाचें नांव. | लेखक. |
|---|---|---|
| १। | महात्मा फुले यांचें चरित्र. | पां० पाटील |
| १। | जलसा शिक्षक. | भाऊराव पाटोळे |
| ·।।।· | जलशाकरितां कविता संग्रह. | महामुनी वगैरे |
| ·।।· | गुलामगिरी. | महात्मा फुले |
| ·।।· | शेटजी प्रताप ( काव्य ) | मुकुंदराव पाटील |
| १ | ढढाशास्त्री परान्ने | ,, |
| ।= | हिंदू आणि ब्राह्मण | ,, |
| ।= | कुळकर्णी लिलामृत | ,, |
| ८= | विठोबाची शिकवण | ,, |
| ८- | सुबोध श्लोक | ,, |
| ·।- | शेतकऱ्यांचें मधुर गायन | पां० भालेकर |
| ८= | ब्राह्मण्य जातीवर नाहीं. | हरिभाऊ चव्हाण |
| ·।· | भ्रष्ट ब्राह्मण श्रेष्ठ | ,, |
| ·।।- | सत्यशोधक समाज | ,, |
| ८= | रामदास तुकाराम भेट | ,, |

| | | |
|---|---|---|
| ८- | आमचे वडील काळे | हरिभाऊ चव्हाण |
| ।॰ | चावडींतील बैठक | ,, |
| ।= | वांग्यांतील भूत | ,, |
| ।- | विधि मार्ग नं. १।२ | ,, |
| ।॰ | भटांचा धूळा | विठ्ठल बिराजी होगे |
| ८≡ | सत्यनारायण पोथी | ,, |
| ।= | घरचा पुरोहित | ना. भास्करराव जाधव |
| ।- | राजर्षि शाहू पोवाडा | लहरी हैदर |
| ८=॥ | कोल्हापुरी पोवाडे | ,, वगैरे |
| २ | स्वयंपुरोहित | मो. तु. वानखडे |
| ८= | आईची अंबील | रामचंद्र जाधव |
| ८= | सद्बोध | ,, |
| ८=॥ | सुबोध सुमनावली | ,, |
| ८- | धर्मभ्रष्ट हिंदूचा धूळा | ,, |
| ८- | राष्ट्रोद्धारक मेळा | ,, |
| ८- | ब्राह्मणाहून व्हावी श्रेष्ठ | ,, |
| ८- | मंगलाष्टके व पंक्तित म्हणणेचे अभंग | ,, |

| | |
|---|---|
| ८- सज्जनगडाचा पोवाडा व प्रतापसिंह महाराजांचा पोवाडा | तुकाराम |
| ।॰ सत्यशोधक वारकरी संवाद | |
| ।= धर्म आणि ब्राह्मण | रा. ब. लठ्ठे वगैरे |
| ।॰ छत्रपति मेळा पद्यसंग्रह | श्री जेधे पुणे |
| ८८॥ मूर्तिपूजा-पाखंड-खंडण | संत तुकाराम |
| ८≡पायपोस किंमतीचे पेशवे | रा. रा. लाड |
| ८=शाहू महाराजांचा पोवाडा | बालतनय |
| ।-जरीपटका व भगवा झेंडा | कुऱ्हाडे |
| ८-देवळांचा धर्म-धर्माचीं देवळें | श्री. ठाकरे |
| ८=शेटजी भटजींचा डाळभात | रा. रा.लाड |
| ८- सत्य | माहात्मा फुले |
| ८८॥स. शो. स. चे सभासदानें घेणेचें प्रतिज्ञा कार्ड. | |
| ॥= सत्यासत्यपरीक्षण | ना. रा. विभूते |
| ८≡ दशावतार प्रदीपिका | ,, |
| ॥- कथासार विवेकामृत | ,, |
| ८= सत्यदेव कथा | ,, |
| ।॰ सन्मार्ग दीप ग्रंथ | ,, |

६- सत्यधर्मामृतकथन ना. रा. चिन्ने

## स्त्रियांना व मुलींना वाचण्यायोग्य पुस्तकें

१ मानससंगीतसरोवर ६-॥ माहेरचें मूळ

।= वनिताबोध ६-॥ सासरची पाठवणी

६≡मुलींची पाठरावणी ६-॥ संसाराचा श्रीगणेशा

१॥। गृहिणीमित्र ६-॥ बापाचा मुलीसउपदेश

६- मुलींचा समाचार ६-॥ पतिव्रताधर्म

६-॥ मंगळसूत्र ६- विजोड्यांचा फार्स

६- शाहू महाराज पाळणा ६≡ ठोशास ठोसा

६-॥शुभांगी ६= बायकांसाठी गाणी

'॥।' सुप्रजाजनन शास्त्र ।- संत बहिणाबाई

६- गोपाळ कृष्णाच्या गोष्टी

## काव्य, पोवाडे वगैरे.

६≡तानाजीचा पोवाडा ६-॥बाजीप्रभूचा पोवाडा

लहरी हैदरकृत ६-॥ तानाजीचा पोवाडा

६-॥ संभाजी महाराजांचा पोवाडा खाडीलकर कृत

| | | | |
|---|---|---|---|
| ८-॥ | प्रतापगडाचा संग्राम | ८-॥ | श्रद्धानंद पोवाडा |
| ८-॥ | झांशीच्या राणीचा पो. | ८- | अंत्यजाचा पाळणा |
| ८- | पद्य संग्रह | ॥= | काव्य कथा |
| -।- | गंगाजळी | ।= | काव्य किशोर |
| ८= | राजर्षि शाहू पोवाडा | ८= | उधळलेली फुले |
| ।- | ,, ,, | ८-॥ | आधुनिक फाजील सुधारणेचा पोवाडा |
| ८= | सद्बोध | | |
| ८- | उमाजी नाईक पोवाडा | ८= | ध्वज |
| ८- | काव्यकुसुम | -।- | स्वनितांजली |
| -।।।- | भावसंगम | ८८॥ | ताराबाईचा पोवाडा |
| ८- | जोधपूरच्या राणीचा पोवाडा | ८=॥ | देशसेवेचा ओनामा |
| | | ८- | मनाचे श्लोक |

## उपयुक्त व वाचनीय पुस्तकें.

| | | | |
|---|---|---|---|
| २ | मनोवांछित संतति | २ | ब्रह्मचर्य हेंच जिवन |
| १। | श्रीकृष्ण चरित्र | १॥ | इनामदाराचा बाळू |
| -।- | विवेकगुटिका | ।= | विवेकानंदसुधा |

## सुप्रसिद्ध शाहिर व दांडपट्टाबहादर

म० ना० नानिवडेकर यांचे पोवाडे.

१ सुधारणेची दिशाभूल पोवाडा. किं. ८१
२ झांसीचीराणी सती लक्ष्मीबाई पोवाडा. ,, ८२
३ श्री छत्रपति शिवाजी महाराज पोवाडा. ,, ८२

येणेप्रमाणें सुप्रसिद्ध पोवाड्यांची सोल एजंसी व प्रकाशकाचे हक्क आम्ही मिळविले आहेत तरी रसिक जनांनी मागणी करावी. व्यापाऱ्यास कमिशन मिळेल.

**सृष्टिविज्ञान** भाग १ ला. ( ले. ग. व. मोडक ) हे पुस्तक इंग्रजी पहिली कारितां कोल्हापूरास सुरू केले आहे. या पुस्तकाची सोल एजन्सी आम्ही घेतली आहे. बुकसेलर्स, मास्तर यांना योग्य कमिशन दिले जाईल.

ता. क. पुस्तकांची मागणी करणाऱ्यांनीं ¼ किं-मत आगाऊ पाठवावीत.

दासराम बुक डेपो,
बुकसेलर्स अँड पब्लीशर्स
महाद्वार रोड कोल्हापूर.

